माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील
गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या
बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन आदेश क्र. मावज २०१८/प्र.क्र.१०८/का.३४अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक १८ डिसेंबर, २०१८

**शासन निर्णय :**

जिल्हा माहिती कार्यालय, बीड येथील जिल्हा माहिती अधिकारी, गट-अ व माहिती अधिकारी, गट-ब ही दोनही पदे मागील जवळजवळ १ वर्षापेक्षा जास्त कालावधी पासून रिक्त आहेत. त्यामुळे त्या कार्यालयाच्या कामकाजावर विपरित परिणाम होत आहे. अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या जिल्हाभेटींना प्रसिध्दी तसेच विविध विकास योजनांच्या प्रसिध्दीवरही विपरित परिणाम झाला आहे. या रिक्त पदांपैकी किमान एका पदावर नियमित अधिकाऱ्याची नियुक्ती केल्यास तेथील कामकाज सुरळीतपणे पार पाडले जाऊ शकते. यास्तव महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्रधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि अधिनियमांच्या कलम ४ (५) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-ब संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांच्या नावासमोर स्तंभ ३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| श्री. किरण रामकृष्ण वाघ | माहिती अधिकारी, परभणी | माहिती अधिकारी, बीड |

२. वरील अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नावासमोर स्तंभ ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर तात्काळ रुजू होऊन आवश्यक अहवाल सर्व संबंधित कार्यालयांस तसेच शासनास विनाविलंब सादर करावा.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदस्थापनेत बदल करण्यासाठी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास त्यांच्या विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्याबाबतचा प्रस्ताव महासंचालक यांनी शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१८१४४५२८८९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2018.12.18 14:50:28 +05'30'

**( रा.ना. मुसळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. मा. राज्यमंत्री ( मा.व.ज. ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४.महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता ), नागपूर,
५.महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व परिक्षा ) ,नागपूर,
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक (माहिती ) (प्रशासन ),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक ( माहिती (वृत्त ) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. संचालक ( माहिती), मराठवाडा विभाग , औरंगाबाद ,
१०. उपसंचालक ( माहिती ), जिल्हा माहिती कार्यालय, लातूर ,
११. उपसंचालक ( लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१२. सर्व विभागीय माहिती कार्यालये,
१३. जिल्हा माहिती अधिकारी, जिल्हा माहिती कार्यालय ,परभणी/ बीड,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी/ बीड,
१५. संबंधित अधिकारी, ( मावज मार्फत )
१६. सामान्य प्रशासन विभाग / का.१२,३४
१७. निवड नस्ती.